**यादृच्छिक कारखाने निरीक्षण योजनेस (Randomisation Inspection Scheme) मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**

**शासन निर्णय क्रमांक - श्रसुपो ०१/२०१५/प्र.क्र.२८/कामगार-१०**

मंत्रालय, मुंबई -४०००३२

दिनांक - २३ सप्टेंबर, २०१५

**प्रस्तावना -**

-मेक इन इंडिया॰ च्या धर्तीवर -मेक इन महाराष्ट्र॰ अभियान राबविण्याचा संकल्प राज्य शासनाने सोडला असुन त्या अंतर्गत उद्योग क्षेत्राला चालना देण्यासाठी, कारखान्यांचे गुणनियंत्रण करण्यासाठी तसेच कारखान्यात काम करणा-या कामगारांचे हित जोपासण्यासाठी विशिष्ट कार्यप्रणाली राबविण्यात यावी, असे शासनाचे धोरण आहे. त्या अनुषंगाने विविध कामगार कायद्यांची प्रभावी अंमलबजावणी होवून कामगारांचे हित जोपासण्या बरोबरच उद्योगाला चालना मिळावी यासाठी कारखान्यांचे यादृच्छिक निरीक्षणे (Random Inspection) करण्याच्या अनुषंगाने यादृच्छिक कारखाने निरीक्षण योजना (Randomization Inspection Scheme) तयार करण्याचा शासनाचा विचार आहे. त्या अनुषंगाने कामगार आयुक्त कार्यालयास देण्यात आलेल्या सूचनांनुसार आयुक्तालयाने नोंदणीकृत असणा-या कारखान्यांचे निरीक्षण करण्यासाठी राज्यस्तरीय निरीक्षण समितीची स्थापना करण्याबाबतचा प्रस्ताव सादर केला असुन त्यानंतर टप्प्या टप्प्याने नोंदीत दुकाने व आस्थापना तसेच अनोंदीत कारखाने दुकाने व आस्थापना यांना लागू करण्याचे प्रस्तावित केले आहे. या समितीची संरचना , कार्यपद्धती , निरीक्षणावेळी दिलेले शेरे इ.बाबत गुणवत्तापुर्वक कार्यप्रणाली निश्चित करुन त्याची अमंलबजावणी करणे अभिप्रेत आहे.

राज्यामध्ये अस्तित्वात असलेले नोंदीत कारखाने, दुकाने व आस्थापना यांचे अधिक प्रभाविपणे निरीक्षण व्हावे तसेच त्यामध्ये पारदर्शकता रहावी आणि एकदंरीत कार्यप्रणालीमध्ये सुसूत्रता असावी व त्याबाबत कालबद्ध कृती आराखडा निश्चित असावा या उद्देशाने अशा निरीक्षणासाठी पुढीलप्रमाणे राज्यस्तरीय निरीक्षण समिती तसेच गुणवत्तापूर्वक कार्यप्रणाली निश्चित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय -**

उपरोक्त पार्श्वभूमिवर कामगार कायद्यांची अंमलबजावणी अधिक प्रभाविपणे व्हावी यासाठी पारदर्शक व विकासाभिमुख निरीक्षण योजना निश्चित करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. विविध कामगार कायद्यांतर्गत निरीक्षणामध्ये पारदर्शकता व सुसूत्रता येण्यासाठी ही योजना स्विकृत करण्यात येत असुन तिचे सर्वसाधारण स्वरुप पुढीलप्रमाणे आहे.

(१) राज्यस्तरीय निरीक्षण समितीचे गठण करणे.

कारखाने तसेच दुकाने व आस्थापना यांचे यादृच्छिक पद्धतीने निरिक्षणे (Randomised Inspection) करण्यासाठी राज्यस्तरीय निरिक्षण समिती गठीत करण्यात येत असुन तिची संरचना पुढील प्रमाणे राहील.

१. मा. कामगार आयुक्त, मुंबई - अध्यक्ष
२. मा. सह कामगार आयुक्त, मुंबई. - सदस्य
३. कामगार उप आयुक्त (प्रशासन), मूंबई -सदस्य
४. कामगार उप आयुक्त (औ.सं.), मुंबई. - सदस्य
५. कामगार उप आयुक्त (ग्रा.वि.) मुंबई. - सदस्य सचिव

सदरहू राज्यस्तरीय निरिक्षण समिती परिशिष्टात दर्शविल्यानुसार १८ कामगार कायद्याच्या अंमलबजावणीच्या संनियंत्रणाचे कामकाज पाहणार असुन, उक्त समितीची कार्यकक्षा खालील प्रमाणे राहील.

अ) तपासणीच्या निकषानुसार आस्थापना व कारखाने यांचे रॅन्डमायझेशन करुन मासिक तपासणी कार्यक्रम तयार करणे.
ब) क्षेत्रीय यंत्रणेकडून मासिक तपासणी कार्यक्रमाची अंमलबजावणी करुन घेणे.
क) निरिक्षण कार्यक्रमावर संनियंत्रण ठेवणे.
ड) तपासणीबाबत मार्गदर्शन करणे.
इ) निरीक्षणाचे निकष ठरविणे व त्यात बदल करणे,
फ) इतर अनुषंगिक कार्य.

(२) सदर समितीमार्फत करण्यात यावयाच्या निरीक्षणाचे वर्गीकरण पुढीलप्रमाणे राहील.

अ) कामगार संख्या ० ते ०९ असणा-या आस्थापनांना लागू असणा-या सर्व कामगार अधिनियमांच्या नियमित (Routine) निरिक्षणातून वगळण्यात यावे.
मात्र महाराष्ट्र दुकाने व संस्था अधिनियम, १९४८ अंतर्गत शासन मसुदा अधिसूचना क्र.एमएस-११/२०१४/सी.आर.२७१/लॅब-१०, दि.१४.११.२०१४ अन्वये तपासणी तसेच ० ते ०९ कामगार असलेल्या आस्थापनातील तक्रारीबाबतच्या प्रकरणी किमान वेतन अधिनियम, १९४८, बाल कामगार अधिनियम, १९८६, दुकाने व संस्था अधिनियम, १९४८, वेतन प्रदान अधिनियम, १९३६ अंतर्गत तपासणी दुकाने निरिक्षक वरिष्ठांच्या पूर्वपरवानगीने करतील. याव्यतिरिक्त या आस्थापनांना इतर अधिनियम लागू असतील तर त्याअंतर्गतची तक्रारीबाबतची तपासणी वरिष्ठांच्या पूर्व परवानगीने सरकारी कामगार अधिकारी करतील. (उदा. समान वेतन अधिनियम).

ब) ज्या कारखाने/ आस्थापना यातील कामगारांची संख्या १० किंवा त्यापेक्षा जास्त आहे, अशा कारखाने / आस्थापनांची तपासणी सरकारी कामगार अधिकारी यांचेमार्फत करण्यात येईल. परंतु असे कि, १० किंवा त्यापेक्षा जास्त कामगार संख्या असणा-या दुकाने व आस्थापनांची तपासणी महाराष्ट्र दुकाने व संस्था अधिनियम, १९४८ अंतर्गत दुकाने निरिक्षक करतील.

(३) संबंधित अपर कामगार आयुक्त, कामगार उप आयुक्त व सहाय्यक कामगार आयुक्त हे विहीत प्रचलित उद्दिष्टांनुसार पर्यवेक्षीय भेटीद्वारे अंमलबजावणीचे कामकाज पाहतील

(४) तपासणी निकष. (Inspection Norms)

अ. अनिवार्य निरिक्षणे (Mandatory Inspection) निरिक्षणे खालील प्रकरणी करण्यात येतील.

(१). न्यायालयीन प्रकरणे

(२). विधीमंडळ बाबी

(३) लोकप्रतिनिधी तक्रारी / नागरिकांच्या तक्रारी

(४) औद्योगिक संबंधविषयक प्रकरणे

(५). विशेष मोहिमा (Special drive) (उदा. बालकामगार , वेठबिगार इत्यादी)

(६). कामगार संघटनेच्या तक्रारी

(७). स्वयंप्रामाणीकरण योजनेअंतर्गत रॅन्डमली निवडलेले २०% दुकाने, संस्था व कारखाने

(८). शासन संदर्भ

ब. अनिवार्य निरिक्षणाशिवाय उर्वरित निरिक्षणाबाबत कार्यपद्धती खालील प्रमाणे राहिल.

राज्यस्तरीय निरीक्षण समिती क्षेत्रीय निरिक्षकांच्या कार्यक्षेत्रातील आस्थापनांची / कारखान्यांची संगणक प्रणालीच्या सहाय्याने उद्दिष्टांच्या प्रमाणात स्वैर (रॅण्डम) पद्धतीने निवड करुन मासिक तपासणी कार्यक्रम निरिक्षकांच्या जिल्हा प्रमुखास सुपूर्द करतील. जिल्हा प्रमुख सदरहू निवडीवरहुकूम भौगोलिक सलगता व कार्यालयाच्या प्राधान्यक्रमानुसारच्या विषयाची सांगड घालून निरिक्षकांचा साप्ताहिक अंमलबजावणी कार्यक्रम तयार करुन निकटच्या वरिष्ठ अधिका-यामार्फत निरिक्षकास एक दिवस अगोदर अवगत करतील. सदरहू तपासणी कार्यक्रम सर्व अधिका-यांकरिता त्या-त्या अधिका-यांच्या निकटच्या वरिष्ठ अधिका-यांमार्फत राबविण्यात येईल.

(५) अनिवार्य निरीक्षणाशिवाय उर्वरित निरिक्षणासाठी दुकाने , आस्थापना व कारखाने यांची निवड करण्याचे निकष खालील प्रमाणे राहतील.

अ) कामगारांच्या संख्येनुसार दुकाने / आस्थापना व कारखाने यांचे खालील प्रमाणे वर्गीकरण करण्यात यावे.

निरीक्षणासाठी दुकाने / आस्थापना/ कारखाने यांची स्वैर निवड कामगार संख्येच्या खालीलप्रमाणे निकषावर करण्यात यावी.

दुकाने / आस्थापना (दुकाने निरिक्षक)

| अ.क्र. | कामगारांची संख्या | वर्गवारी | टक्केवारी (एकूण उर्वरीत निरीक्षण उद्दिष्टांच्या) |
|---|---|---|---|
| १. | ३०१ च्या पूढे | अ | १० |
| २. | १०१ ते पूढे ३०० | ब | २० |
| ३. | ५१ ते १०० | क | ३० |
| ४. | १० ते ५० | ड | ४० |

कारखाने /औद्योगिक आस्थापना (सरकारी कामगार अधिकारी)

| अ.क्र. | कामगारांची संख्या | वर्गवारी | टक्केवारी (एकूण उर्वरीत निरीक्षण उद्दिष्टांच्या) |
|---|---|---|---|
| १. | ५०१ चे पूढे | अ | १० |
| २. | ३०१ ते पूढे ५०० | ब | २० |
| ३. | १०१ ते ३०० | क | ३० |
| ४. | १० ते १०० | ड | ४० |

(६) सदरहू कार्यपद्धती तीन टप्प्यात अंमलात आणण्यात येईल. पहिल्या टप्प्यात सर्व कारखाने , दुस-या टप्प्यात १०० पेक्षा जास्त कामगार संख्या असणारी दुकाने / आस्थापना तर अंतिम टप्प्यात उर्वरीआत आस्थापनांना यात समाविष्ट करण्यात येईल.

(७) सदर राज्यस्तरीय निरीक्षण समिती मार्फत तयार करण्यात येणारी यादी याद्दच्छिक पद्धतीने तयार करण्यात येणार असुन त्यामधील सर्व निरिक्षणे आकस्मिक स्वरुपाची (Surprise) असतील व वरिष्ठांच्या पूर्वपरवानगीने करण्यात येतील.

(८) कामगार आयुक्तांच्या अधिपत्याखालील सर्व निरिक्षकास सर्व अधिनियांतर्गत नमुना तपासणी सूची (Inspection Check list) उपलब्ध करुन दिली जाईल. तसेच सदर नमुना तपासणी सूची संकेत स्थळावर (Website) उपलब्ध करुन देण्यात येईल.

(९) निरिक्षकांनी त्यांना देण्यात आलेल्या निरिक्षण कार्यक्रमानुसारच आस्थापनांचे निरिक्षण करावे, निरिक्षकांनी सोबत जोडलेल्या १८ अधिनियमांच्या सूचींपैकी जे अधिनियम आस्थापनेस लागू असतील तेवढ्या सर्व अधिनियमांतर्गत निरिक्षण शेरे पारित करावेत.

(१०) निरिक्षण शे-यातील त्रुटींची पूर्तता करुन घेण्याची जबाबदारी निरिक्षकाच्या निकटच्या वरिष्ठ अधिका-याची असेल. संबंधित वरिष्ठ अधिकारी पूर्ततेसाठी विहीत केलेल्या कायदेशीर तरतूदीप्रमाणे कार्यवाही करेल. पूर्तता न झालेल्या निरीक्षणाच्या अनुषंगाने पुढील कार्यवाही / कारवाई करण्याचे आदेश संबंधित वरिष्ठ अधिकारी संबंधित निरीक्षकास देतील

(११) निरिक्षणे व ज्या प्रकरणी त्रुटींची पूर्तता झाल्याबाबचा अहवाल नोंदविण्यात आला असेल अशी प्रकरणे समितीतर्फे स्वैर पद्धतीने तपासली जातील.

(१२) कामगार आयुक्तालयाच्या संगणकीकरणाचे कामकाज प्रगतीपथावर असून संबंधित कामगार कायद्यांचे डिजीटायजेशनचे कामही सुरु आहे. ते पूर्ण होताच सदर कार्यप्रणाली “ऑनलाईन” पद्धतीने सुरु करण्यात यावी. तथापि, सद्यस्थितीत ही निरीक्षण प्रणाली मॅन्युअल पद्धतीने राबविण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थाळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संकेतांक २०१५०९२३१५१४५९९३१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Balasaheb Sopan Kolase

Digitally signed by Balasaheb Sopan Kolase
DN: c=IN, o=All India Service, ou=IAS, postalCode=110001, st=Maharashtra, cn=Balasaheb Sopan Kolase
Date: 2015.09.23 15:21:04 +05'30'

**बाळासाहेब कोळसे**
(शासनाचे सहसचिव)

**प्रत-**

१) मा.मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव.
२) मा. राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव.
३) प्रधान सचिव (कामगार) यांचे स्विय सहायक.
४) कामगार आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५) विकास आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६) कल्याण आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७) संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई.
८) संचालक, बाष्पके, मुंबई.
९) मुख्य दुकाने निरिक्षक, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई.
१०) निवड नस्ती (कामगार -१०).

## परिशिष्ट

कामगार कार्यालयामार्फत अंमलबजावणी करण्यात येणारे कामगार कायदे.

१. किमान वेतन अधिनियम १९४८
२. वेतन प्रदान अधिनियम १९३६
३. समान वेतेन अधिनियम १९६७
४. बोनस प्रदान अधिनियम १९६५
५. महाराष्ट्र कामगार किमान घरभाडे भत्ता अधिनियम १९८३
६. महाराष्ट्र दुकाने व आस्थापना अधिनियम १९४८
७. विडी व सिगार कामगार (नोकरविषयक अटी) अधिनियम १९६६.
८. कंत्राटी कामगार (नियमन व निर्मुलन) अधिनियम, १९७०.
९. मोटार परिवहन कामगार अधिनियम १९६१.
१०. विक्री संवर्धन कामगार (सेवाशर्ती) अधिनियम १९७६.
११. इमारत व इतर बांधकाम कामगार (रोजगारांचे नियमन व सेवाशर्ती) अधिनियम १९९६.
१२. श्रमिक पत्रकार आणि पत्रकारेत्तर (सेवाशर्ती) संकिर्ण अधिनियम १९५५.
१३. आंतरराज्य स्थलांतरीत कामगार ( रोजगारांचे नियमन व सेवाशर्ती) अधिनियम १९७९.
१४. बाल कामगार (प्रतिबंध व नियमन) अधिनियम १९८६.
१५. प्रसुती लाभ अधिनियम १९६१.
१६. उपदान प्रदान अधिनियम १९७२.
१७. महाराष्ट्र माथाडी हमाल व इतर श्रमजीवी कामगार (नोकरीचे नियमन व कल्याण) अधिनियम १९६९.
१८. महाराष्ट्र खाजगी सुरक्षा रक्षक (नोकरीचे नियमन व कल्याण) अधिनियम १९८१.